**महाराष्ट्र राज्य शेती महामंडळाच्या रावळगाव मळयातील मौजे अजंग, ता. मालेगाव, जि. नाशिक येथील ब्लॉक क्र. ११ व १३ मधील एकूण ३४५ हे. २५ आर क्षेत्र महाराष्ट्र राज्य औदयोगिक विकास मंडळास हस्तांतरीत करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : मशेम २०१७/प्र.क्र.२१/ल-७**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड
मंत्रालय, मुंबई ४०००३२
दिनांक : ११ ऑगस्ट, २०१७

**प्रस्तावना :-**

मालेगाव हे औद्योगिक व व्यापारी शहर असून मालेगाव शहरातील सद्याची सुत- कापड (Textile) उद्योगाची प्रचंड क्षमता लक्षात घेता सदर परिसरात सुत- कापड, शेती पुरक व इतर उद्योगांचा विकास होण्यासाठी महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळामार्फत औद्योगिक क्षेत्र स्थापन होणे आवश्यक आहे. त्यादृष्टीने महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाने त्यांच्या दिनांक १०/१०/२०१६ रोजीच्या पत्रान्वये महाराष्ट्र राज्य शेती महामंडळाच्या रावळगाव मळयातील मौजे अजंग,ता. मालेगाव, जि. नाशिक येथील ब्लॉक क्र. ११ मधील गट क्र. ५०९, ५१४,५१६ व ५२४/१ मधील एकूण क्षेत्र १७८ हेक्टर ८१ आर तसेच ब्लॉक क्र. १३ मधील गट क्र. ५२५/१ व ५२६ मधील क्षेत्र १६६ हेक्टर ४४ आर असे एकूण ३४५ हेक्टर २५ आर क्षेत्राची औद्योगिक क्षेत्र विकसीत करण्याकरीता महाराष्ट्र राज्य शेती महामंडळाकडे मागणी केली आहे. त्याअनुषंगाने मंत्रिमंडळाच्या दिनांक २७/०७/२०१७ च्या बैठकीत झालेल्या निर्णयास अनुसरुन शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

मालेगाव शहरातील परिसरात सुत- कापड, शेती पुरक व इतर उद्योगांचा विकास होण्यासाठी महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळास वस्त्रोद्योग उद्यान विकसित करण्याकरिता महाराष्ट्र राज्य शेती महामंडळाच्या मालकीची रावळगाव मळयातील मौजे अजंग, ता. मालेगाव, जि. नाशिक येथील ब्लॉक क्र. ११ मधील गट क्र. ५०९, ५१४,५१६ व ५२४/१ मधील एकूण क्षेत्र १७८ हेक्टर ८१ आर तसेच ब्लॉक क्र. १३ मधील गट क्र. ५२५/१ व ५२६ मधील क्षेत्र १६६ हेक्टर ४४ आर असे एकूण ३४५ हेक्टर २५ आर जमीन, रूपये ३४,१७,९७,५००/- (अक्षरी रुपये चौतीस कोटी सतरा लाख सत्याण्णव हजार पाचशे फक्त ) इतक्या रक्कमेस महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, मुंबई यांना कब्जेहक्काने हस्तांतरीत करण्यास महाराष्ट्र शेत जमीन (जमीन धारणेची कमाल मर्यादा) अधिनियम, १९६१ च्या कलम २८-१अअ च्या पोटकलम (३अ) अन्वये शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

२. प्रस्तुत जमीन हस्तांतरणाबाबतच्या अटी व शर्ती पुढीलप्रमाणे राहतील :-

(१) प्रस्तुतची जमीन महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ भोगवटादार वर्ग - २ म्हणून धारण करील.

(२) सदर जमिनीचा वापर औद्योगिक क्षेत्र विकसित करणे या प्रयोजनासाठीच करणे बंधनकारक राहील.

(३) प्रस्तुत जमिनीच्या हस्तांतरणाकरिता रु. ३४,१७,९७,५००/- एवढी रक्कम महाराष्ट्र राज्य शेती महामंडळास महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाकडून देण्यात आल्यानंतरच सदर जमिनीचा ताबा महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळास देण्यात येईल.

(४) महाराष्ट्र राज्य शेती महामंडळास उक्त जमिनीच्या हस्तांतरणापोटी महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाकडून प्राप्त होणा-या रक्कमेचा विनियोग महाराष्ट्र राज्य शेती महामंडळाकडे शासनाच्या असलेल्या थकीत कर्जाची परतफेड करण्यासाठी करण्यात यावा.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.mahrashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०८१११६३८३५१५१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

Sunildatt Bhikaji Patankar

Digitally signed by Sunildatt Bhikaji Patankar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5f53ca0c0de2eb56d666f3fb5b5dddd3198e215f7d689e58339a094f81b6f516, cn=Sunildatt Bhikaji Patankar
Date: 2017.08.11 16:28:40 +05'30'

**(सु.भि. पाटणकर)**
सह सचिव
महसूल व वन विभाग

**प्रत** :- १) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
२) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई
३) मा. मंत्री, (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४) मा. राज्यमंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई
६) अपर मुख्य सचिव, उद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
७) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय ,मुंबई
८) प्रधान सचिव, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
९) विभागीय आयुक्त, नाशिक विभाग
१०) जिल्हाधिकारी, नाशिक
११)व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य शेती महामंडळ, पुणे
१२) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, मुंबई
१३) निवडनस्ती कार्यासन ल-७ (महसूल व वन विभाग), मंत्रालय, मुंबई.